

बाप्पा आले नि अगदी रुखरुख लावून गेले ....
या वेळीही नेहमीप्रमाणेचं ....

हो हो जाणतो आम्ही, म्हणूनच तर युध्द्पातळीवर
काहीतरी करायच ठरवल आम्ही ...
काय बर करुयात ?....

## येस्स्स्स्स्सस - दांडीया क्लासेस !!!

एखादा गरब्याचा , दांडीयाचा क्लासचं काढुयात ,
शिकण्यापरी शिकणही होईल
सरावापरी सरावही.
कुठे..?

अहो कुठे काय कुठे ?
अर्थात आमच्याकडेचं !
हो..हो... जरी आजकाल अशा क्लासेसच्या सर्रास
जाहिराती ऐकतो रेडीओसिटीवर... पेपरात वाचतो
तरी त्या मधे आमच्यासारख कुणीच
मार्गदर्शन करु शकणार नाही हं आपल्याला !

ईथे नुसती थेअरी, प्रॅक्टीकल्स
आणि सरावच नसणार तर त्यासोबत तो शिकताना
येणारी धम्माल.... उडणारी तारांबळ....
घ्यायची दक्षता....
आणि होणा-या परिणांमांची मानसिक तयारीही
करुन घेण्यात येईल.....
तीही अगदी
चकटफ़ू !!!



तर आम्ही खाआआआआआआस आपल्यासाठी
घेऊन येतोय ई-स्टापचा हा धम्माल विनोदी अंक.....

## " दांडीया स्पेशल - रासलिला !!! "



काय 'घडेल-बिघडेल' असं विचारताय ?

अहो , मुला-मुलींना लावायच्या वळणाबद्दल मी तर
पु.लंच्या मताशी पूर्णपणे सहमत आहे बाबा...

" मुलगी अगर मुलगा सरळ वळणाची
अगर वळणाचा कसा असतो कोण जाणे !

कारण वळण म्हटल्यावर
ते सरळ कसे असणार ?
भूमितीला बुचकळ्यात ढकलणारी ही सरळ
वळणाची आडवळणी व्याख्या आहे.

" मग काय पटतयं न आपल्यालाही ?
आणि हो नुसतचं
स्टेप्स शिकून भागणार नाही हं !

सराव हा हवाच ना... प्रत्येक गोष्ट शिकताना.... अं ??
मग लागा तर सरावाला ... लाजत मुरडत का होईना ...

## लाजत मुरडत आली ...



लाजत मुरडत आली , पदरास बिलगत आली
राणी
लाजत मुरडत आली ,पदरास बिलगत आली

वारा हलेना डोळा थजेना
पाहुन भोवताली
लाजत मुरडत आली ,पदरास बिलगत आली

वेडा तुझा पाउसहा
बागडे वर खाली
लाजत मुरडत आली ,पदरास बिलगत आली

चांदण्या रातीत मोजत मापीत
नजरेच्या हालचाली
लाजत मुरडत आली, पदरास बिलगत आली

हवा कोवळी ही अदा कोवळी
जुनेजाणते हे मवाली
लाजत मुरडत आली , पदरास बिलगत आली

तुझी साथ आता उराला दिलासा
कस्तुरी मखमाली
लाजत मुरडत आली , पदरास बिलगत आली

सोनेरी किरणॆसोनेरी लाटा
अन काजळाची दिवाळी
लाजत मुरडत आली , पदरास बिलगत आली

- मकरंद सखाराम सावंत

परवाचीच गोष्ट बघा ना.....

बसमध्ये सुरेश सारखा त्या मुलीशी बोलण्याचा
व काही ओळख निघते का ते पाहण्याचा प्रयत्न करत होता.

“तुम्हाला कुठं तरी पाहिलयं, पण नक्की आठवत नाही ” ...
आपले वडील काय करतात ?
“ ते डॉक्टर आहेत ”, वैतागून मुलगी म्हणाली.
“ तरीच ....”, सुरेशचा धीर वाढला,
“ आता मला आठवल, मी एकदा आजारी पडलो होतो ,
तेव्हा त्यांनी औषध दिलं होतं”.
“ शक्य आहे ”, ती मुलगी म्हणाली,
“ ते जनावरांचे डॉक्टर आहेत ”.



अशी फ़ट्फ़जिती टाळायची असेल तर क्लासच्या
नऊ तासांना बंक न मारता हजेरी लावा हं!
एवढ्या थोड्या अवधित बरेच प्रकार शिकायचेत नं!

डोढीयु - पोणीयू ..!

तीन टाळी - दोन टाळीत ..!

डिस्को दांडिया ..!

हिप होप दांडिया ..!

म्युझिक दांडिया ..!

आणि खास आकर्षण ...

स्पेशल प्रिपरेशन फोर मेन - ब्युटी टाटुज फोर मेन अबाउट फ्रंटलेस ..!
स्पेशल प्रिपरेशन फोर वुमेन -ब्युटी टाटुज फोर वुमेन अबाउट बेकलेस ..!

यंव आणि त्यंव ....!!! चला तर मग येताय नं हे रंगिले तास अटेंड करायला ?

## रास रंगला ...

रास रंगला ग सखे रास रंगला
आज प्रितीचाच जणू 'क्लास' रंगला ..!!

तो मुजोर, चित्तचोर वेड लावतो
आणि हास्य मुखावरी गोड दावतो
वाटे 'फासण्याचा' पुन्हा फास रंगला ..!!

हा असाच वाट पाहे आज दिसाची
रासक्रीडा चाले मग शृंगार रसाची
त्याच साठी आज पुन्हा हा खास रंगला ..!!

हीच संधी याच्यासाठी हर्षभराची
साठवून ठेवी याद वर्षभराची
आता संगतीचा जणू त्रास रंगला ..!!

हाच सखे माझ्यासाठी जीव टेकतो
चोरूनिया ओळखीचे बाण फेकतो
बघते दुनिया आमचा 'सहवास' रंगला ..!!

रात होता याचा फार जोर वाढतो
कित्येक टिप-या हा धडाधड मोडतो
सरलेच नऊ दिस शेवटचा तास रंगला ..!!



- रमेश ठोंबरे





अशी मग सज्ज झालेली मुल-मुली
रिंगणात उतरतात....
आपापली दुःख्ख दांडीयात बुडवतात.
त्यांची परस्परांबद्दलची मतही
ठाम असतात अगदी.....

बॉयः बस, ट्रेन और लड़की एक जैसे होते है.
एक जाती है.... दूसरी आ जाती है ...!!

गर्लः ऑटो, टॅक्सी और लड़का एक जैसे होते है.
एक को बुलाओ.... चार आते है...!!

आणि तरीही....

तुझं-माझं पटेना नि तुझ्यावाचून करमेना.....
जित्याची खोड मेल्यावाचून थोडीच जाणार?

चौकाचौकात .... दरदिवशी दांडीयाचे खेळ रंगतात
मग करतील तरी काय ही बिचारी पोर ...??





# काय करतील बिचारी पोरं ...

वाजत गाजत आलेले बाप्पा
जाताना हळवं करुन जातात
कट्ट्यावरच्या पोरांचे मग
ग्लास दारुने भरुन जातात

थोडी पिऊन होतय काय
चढायला जास्त प्यायला लागते
मग टांगा पलटी..... घोडे फरार
स्वारी चंद्रावर जायला लागते

काय करतील बिचारी पोरं
मनातलं दुःख दडवण्यासाठी
प्यायलाच लागते दारु त्यांना
दुःख ग्लासात बुडवण्यासाठी

गणपतीबाप्पा नदीच्या पात्रात
अजुन नीटसे शिरलेले नसतात
ढोल ताशांचे नाद अजुन
हवेमधुन विरलेले नसतात

तरी मनावर दगड ठेऊन
पोरं लागतात पुढच्या कामाला
फिरतात उन्हात वर्गणी मागत
नवरात्रीच्या नावाला



तुमच्याचसाठी धडपड करत
कार्यकर्ता झटायला लागतो
कष्टानं विसरुन ढोलताशा
दांडीया आयोजीत करायला लागतो

काय करतील बिचारी पोरं
दर्द हसुन उडवण्यासाठी
करायलाच लागते नवरात्र साजरी
दुःख दांडीयात बुडवण्यासाठी

दांडीयाचे सुर आले की
पावलं आपोआप नाचायला लागतात
मग वेध लागतात रासलील्याचे
अन मनात पैंजण वाजायला लागतात

हेरुन ठेवले असतात पोरांनी
पैंजण आधिच आपले आपले
मग चालु होते टप्पे टाकणे
अन डाकु डाव कसले कसले

हा तुझा डाव, ती माझी छावी
अशी साधी सोपी वाटणी होते
आपापल्या आयटमला भिडायला
मग मंडळावर आखणी होते

काय करतील पोरं बिचारी
मुलींना एकटं अडवण्यासाठी
लावायलाच लागते फिल्डींग त्यांना
दुःख प्रेमात बुडवण्यासाठी



सगळे कृष्ण आवरुन तयार
आपापल्या राधेची वाट बघत
नख-याचा कहर, गज-याचा बहर
अन चणिया-चोळीचा थाट बघत

तिचा एक तिरका कटाक्ष
डोळ्यातल्या आगिची झळ बसते
तिच्या छुमछुमणा-या पैंजणांनी
छातीत गोड कळ असते

पण छुमछुम करत आलेले पैंजण
कोणा दुस-यासोबत पसार होतात
मग दांडीया रुततात उरामध्ये
आणि छातीवरती प्रहार होतात

आणखिन एक दु:ख पचवुन
मग दांडीया पकडल्या जातात
पुढच्या चौकात नविन दांडीया
आणि राधा सुद्धा बदलल्या जातात

आता रोज रात्री नविन चौक
आणि नविन राधा असतात
काय करतील बिचारी पोरं
दु:ख जेंव्हा जादा असतात ...!!

- धुंद रवी.

प्रियकर - सुंदर मुली कधीच कोणत्या मुलाच्या मागे धावत नाहीत
प्रेयसी - कशावरून ??
प्रियकर - पिंजरा कधी उंदराच्या मागे धावलेला पहिला आहेस का ??

अरे हो हो सुंदर मुलींच्या जाळ्यात ही मुलं
आपण होऊन अडकतात, हे अगदी मान्य...
पण ..... जर अशा या नटल्या थटल्या अप्सरेला
खुद्द इंद्रच पारखा झाला तर ???

बिचारा पाऊस पाडूनही स्वतः मात्र
कोरडाच राहील की हो.... पावसाच्या दोन थेंबात !

## अप्सरा ...



हातात टीप-या कपाळी टिकल्या पायात पैंजण घोळे
ठेक्यात चाले तालात बोले ओठ गुलाबी ओले ....

खिळती नजरा छळतो गजरा नजरेचे ते चाळे
गालात लाली चमकी वाली डोळे अप्सरा वाले ....

नको गं राणी खेळू अनवाणी दगडांचे हे जाळे
रुतेल काटा दुखतिल टाचा पायात येतिल गोळे ....

देतेस गिरक्या घेतेस फ़िरक्या राडा मंडळी डोले
सुकेच राहतो आम्ही दिवाणे तुझे अंग अंग ओले ....

- सुधीर मुळीक...

शेवटी प्रत्येक दुःखाची जात-कुळी वेगळाली असते हेच खरं !!!



( एकदा एक व्यक्ति विवाह मंडळाच्या कार्यालयात गेली )
गृहस्थ- माझे वय चाळीस वर्षं आहे.
व्यवस्थापिका- बोला काय सेवा करू?
गृहस्थ- मला माझ्या वयाची वधू पाहिजे.
व्यवस्थापिका- चाळीस वर्ष, कठीण आहे.
गृहस्थ- मग, वीस-वीसच्या दोन चालतील.

हे रे शब्बास पठ्ठ्या !
पाहिलत , यांच्यालेखी काय किंमत असते बायकांची ...
म्हणे वीस-वीसच्या दोन चालतील...

काय चिल्लर वाटलो की काय? असो !!!

नाहीतरी प्रत्येकाच्या मनात एक रावण खोलवर दडलेला असतोचं शेवटी....

## रावण ...

एवढे सारे जाळले तरी
पुन्हा रावण कुठुन येतात?
पुढच्या विजयादशमीला
पुन्हा नव्याने त्रास देतात.

देखावा म्हणून आपण
सारेच रावण जाळत असतो !
आपापल्या मनात एकेक
सारेच रावण पाळत असतो !!

सुर्यकांत डोळसे ...

या दस-याला प्रत्येकाने ठरवून स्वत:तील एका वाईट प्रवृत्तीचे दहन केले तरी हा दसरा सार्थकी लागेल





प्रेयसी : काय झालं रे, आज तू खूप दु:खी दिसतोस ?
प्रियकर : हो गं ! आज मी एक पुस्तक वाचलं.
त्याचा अंत खूप दु:खद होता.
प्रेयसी :कोणतं पुस्तक ?
प्रियकर : माझं पासबुक

हे…हे…हे….

आहो…हे क्लासेस…त्यांच्या भरघोस फ़िया…..
ते कमीत-कमी २-३ प्रकारचे घागरा-चोळी,
अनुरुप दागिने, ब्युटीपार्लर, मेक-अप….
मग खिसे रिकामे नाही होणार तर काय ??
आणि बघा न तरी 'ती' गरबा खेळते….
बिचारा 'तो' !!!





## तरी ती गरबा खेळते ....

माझा डोळा चुकवून ती दांडीयाला पळते,
तिला हजारदा सांगितल तरी ती गरबा खेळते

प्रत्येक दिवशी नविन रंग
तिच्या नटण्याचे नवे नवे छंद
मी देवदास गॅलरीत उभा
माझी पारो टीप-यात दंग
माझ्या काळजाची घालमेल
तिला कुठे कळते,
तिला हजारदा सांगितल
तरी ती गरबा खेळते ....

आज नको जाउ राणी
हव तर मीच भरतो पाणी
माझ्या हातात हंडा देउन
ति मेकअप करते शहाणी
आज फ़क्त बघायला जाते म्हणून
हळूच घराबाहेर पडते,
तिला हजारदा सांगितल
तरी ती गरबा खेळते ....

मला गरबा येत नाही
आणी तिचा काही सुटत नाही
उशीर झाला म्हणून डबा नसतो
ती सकाळी लवकर उठत नाही
लवकर झोप म्हणालो तर ...
माझी उशी सोफ़्यावर नेउन ठेवते
तिला हजारदा सांगितल
तरी ती गरबा खेळते ....



कधी कधी मी टिप-या लपवतो
कपाटाच्या किल्ल्या हरवतो
नउ दिवस बागडणा-या चंद्राला
मी नजर कैदेत बसवतो
जन्म कैद झाल्यासारखी
ती हूंदके देउन रडते ....
तिला हजारदा सांगितल
तरी ती गरबा खेळते ....

मी जा म्हणतो दुस-या दिवशी
नाकावर राग, ऐकेल तरी कशी
मी नाही जात जा म्हणून
फ़ोडते घरातली कपबशी
चंद्र असुनही घरात माझ्या
चक्क आमावस्या पसरते
तिला हजारदा सांगितल
तरी ती गरबा खेळते ....

सुधीर मुळीक ...

त्याला तर येतच नसतो
हा असला गरबा, दांडीया प्रकार...





क्रिकेटपटू (गोलंदाज) :- प्रिये मीच तुझा पहिला प्रेमी आहे ना ?
प्रेयसी:- बावळट बोलरला कधी ओपनिंग बॅटींग मिळते का ?

अशीही पाळी येते हं कधी कधी ....



असतात काही महाभाग.....
या गरबा-दांडिया प्रकारात अगदीच शून्य !!!
त्यांचा पहिला-वहिला गरबा कसा रंगत (भंगत) असेल हो ?

चला तर आपणही चाखुया की लज्जत
या पहिल्या-वहिल्या गरब्याची..........



# पहिला गरबा.....

पहिलाच गं गरबा माझा ...
पहिलाच गं...
तुझ्या बुलाव्याने मी आलोय
इथे आज गं...

सांग कश्या पकडायच्या
हातामध्ये टिप-या ?
सांग कुठवर वाढवायच्या
लांबलचक झिप-या ?
सांग कसा फेर घालून
नाचायचा नाच गं...
पहिलाच गं गरबा माझा ... पहिलाच गं...

सांग कधी बदलायच्या
असतात जोड्या ?
सांग कधी काढायच्या
मुलींच्या खोड्या ?
सांग कधी वागायचे
नसल्यासारखी लाज गं
पहिलाच गं गरबा माझा ...
पहिलाच गं...

खरं सांगतो, जमणार नाही
मला असली थेरं
एका पोरीसोबत इथे
नाचती चार चार पोरं
उगाच मी आलो
तुझ्यासंगे आज गं
पहिलाच गं गरबा माझा ...



- राज जाधव



रंगरावानं घराच्या वाटेवर एक फुलांचा गुच्छा घेतला. एक सेंटची बाटली घेतली. एक मोठी कॅटबरी घेतली आणी घरी आल्या आल्या त्यानं चंदाच्या भोवती गोल-गोल फे-या मारायला सुरुवात केली.

एक फेरी झाल्यावर त्यानं गुच्छा दिला.
दुसऱ्या फेरीनंतर सेटंची बाटली दिली.
तिस-या फेरीनंतर चॉकलेट.

"अरे पण कशासाठी?"
प्रत्येक फेरीनंतर चंदा विचारीत होती.

"उगीच! विनाकारण, गंमत म्हणून."

प्रत्येक फेरीनंतर चंदाचा संयम संपला.
रंगरावाची कॉलर पकडून चंदानं उलट तपासणी चालू केली,

"तुझ्या कोणत्या तीन मैत्रिणी तुला भेटल्या होत्या ते ब-या बोलानं सांग."

च...च...च....

चोर सोडून सन्याश्याचा बळी !!!

पण नवरात्रीचा मौका पाहून हे कान्हे
राधे भोवती कसे फ़ेर धरतात...पिंगा घालतात...
ते हे प्रियकरच जाणे...



# रीपोरी पोरी ग ...

रीपोरी रीपोरी
रीपोरी पोरी ग

फिरू किती मागे गं वेड तुझे लागे गं,
तू हसता झाली माझी बोलायची चोरी गं

जाते का पाठमोरी थोडीशी वळ तू
सोड दुरावा आता येना जवळ तू
थोडीशी लाडीगोडी थोडीशी छेडाछेडी
बांधाया आणली मी प्रेमाची दोरी गं

रीपोरी रीपोरी
रीपोरी पोरी ग

स्वप्नात माझ्या तू येतेस राणी
प्रेमाची गोड गोड गातेस गाणी
राणी दिवाणी तू झुळ झुळ पाणी तू
भरुनिया पाटी गेली मनाची कोरी गं

रीपोरी रीपोरी
रीपोरी पोरी ग

नवरात्रीचा आज आहे गं मौका
धरूया ताल आणि टिपरीचा ठेका
तू माझी राधा गं मी तुझा कान्हा गं
घालूया गरब्याची गोल गोल फेरी गं

रीपोरी रीपोरी
रीपोरी पोरी ग

- दीपक साळुंके

त्यक्ती आणि वल्ली" .....एक प्रसंग......
चितळे मास्तर
................................................................

एकदा जमिनीवरचे वारे आणि समुद्रावरचे वारे शिकवीत होते.
"हं, गोदाक्का, सांगा वारा कुठल्या दिशेला वाहतोय?"
"गोदाक्का, वारा वाहतोय कुठल्या दिशेनं?"
गोदी आपली शंकू वाण्याच्या दुकानातल्या पोत्यासारखी
बाकावरच ढुप्प करून बसलेली. "कार्टे,
बूड हलवून उभी राहा की जरा. आश्शी!"
अगदी मॅट्रीकपर्यंतच्या मुलीलादेखील 'बूड' हलवून उभी राहा
असे सांगण्यात काही गैर आहे.
असे चितळे मास्तरांनाही वाटत नसे आणि त्यांच्या
पुढल्या शिष्यगणालाही वाटत नसे.
मग गोदी खालचा ओठ पुढे काढुन
शुंभासारखी उभी राहायची.
"हां, सांगा आता, कुठले वारे वाहताहेत?"
मास्तरांनाही विचारले, गोदी गप्प.
"गोदुताई, तुझा पदर कुठल्या दिशेला उडतोय बघ'
डोंगराच्या की समुद्राच्या? राम्या तु सांग."
मग गोगट्यांच्या राम्या
बिनदिक्कत गोदीला म्हणाला होता,
"ए गोदे, नीट उभी राहा की--"
"का रे राम्या?" मास्तर दटावायचे.
"मग आम्हाला तिचा पदर नीट दिसणार कसा?"
"तिचा पदर कशाला दिसायला हवा?"
"मग वारा डोंगराकडे की समुद्राकडे कळणार कसं?"
"भोपळ्या, अरे परीक्षेत गोदीला का उभी करणार आहेस?"
अरे. दिवसा वाहतात ते लँड विंड्स की सी विंड्स?"
मग सगळया वर्गाकडुन "दिवसा वाहतात ते--" ह्या चालीवर पंचवीस वेळा घोकंपट्टीव्हायची.
आणी मग "गोदीच्या पदराचा आणि लँड विंड्सचासंबंध.....?"
" ना ~ ~ ~ ~ही ! " पोरे ओरडायची.



या उता-याप्रमाणेच ह्या रासलिले त्यतरिक्त
दस-याचा जो खराखुरा मतितार्थ आहे तो समजून घेवूयात....

## विजयादशमी सार्थ करुया ...

खूप जाहला रास दांडिया,
गरबा टिप-या नाद सोडु या,
वीरश्रीयुक्त हुंकार उठवूया,
विजयादशमी सार्थ करुया ...

आज वाजू दे शंख चौघडा,
मर्दपणाने,शड्डू ठोकू या,
षंढपणा फेकून देऊनी,
पुरुषार्थाचा धडा गिरवू या ...

पुरे शिष्टाई खोटया बाता,
शब्द बुडबुडे नकोच आता,
घ्या शस्त्रे ती पूजा करुनी,
प्रत्यक्ष कृतीचा मुहुर्त गाठा ...

पेटू दे स्फुल्लिंग मनी या,
खवळू दे अन खुशाल रक्ता,
एक निश्चये एक दिलाने,
अन्यायाशी झुंजू आता ...

मी दुबळा हे खोटे क्रंदन,
मीच मला घातले कुंपण,
सीमोल्लंघन ते करुया आपण,
विजयश्री अन आणू खेचून



- शैलजा शेवडे

## मी जेव्हा दांडिया खेळतो....!!!



आज घरी येताना माझा मूड चांगलाच होता ...
त्याच कारण मझी बायको ... कारण कोणाला
पटण्यासारखं नाही .. पण आज मला प्रेमाने फोन
करून म्हणाली होती ...

“ आहो आज जरा लवकर या ना ”, ती अस म्हणाली
की माझ्या छातिचे ठोके दणादण वाढु लागतात
बायकोने लाडात संवाद साधला  की  समजुन जायच
काहीतरी स्वार्थ नक्की असतो त्यामागे,
मी म्हंटल का गं .. ?  तर म्हणाली
"आज आपण दांडिया खेळायला जाउया...!!"
मी मनातच म्हंटल रोज रात्री लाटण घेउन माझ्या
मागे घरभर खेळतेस ते काय कमी आहे ...!!
तरी पण असो मी म्हटल " जाउया " ...

काय करणार बायकोची प्रत्येक ईच्छा पूर्ण करण्याची
शपत घेतलिय ना सात फेरे घेताना...  त्या वेळेस
बरं वाटलं होता पण आत्ता काय ते खर कळतय...
घरी जायला तसा नेहमी प्रमाणे उशीर झाला होता,
तिनदा बेल वाजवली तर आतून जोरात ओरडली
“ थांबा थोडा वेळ, येतय ना ...! ” मी म्हटला थांबा
आत्ता बाहेर अर्धा तास ... कारण हिचा जरा वेळ
म्हणजे कमीत कमी अर्धा तास ,
पण आज लवकर आली चक्क पंधरा मिनीटात दरवाजा
उघडला तिने, मी आत गेलो तर रागारागाने मला
विचारल किती तो उशीर करता हो तुम्ही..
च्या मायला .. म्हंटल ह्या तर चोराच्या उलट्या ...



माझ्याकडे पाठ करून म्हणाली आहो जरा जवळ याना .. !!
मी लगेच खुश..! जरा ही गाठ बंधा ना ...!! मी लगेच हो ..
कारण मला ती पठामोरीच जास्त आवडते पुढून तिचा
सामना करायचा म्हणजे रागाने लाल झालेली अवदसा.!!
मी गाठ बांधली आणि आत जाउन कपडे बदलून घेतले
आणि निघालो.. दरवाजा बंद केला आणि लॉक करता करता
हिच्या लक्षात आला की लिपस्टिक राहिली घ्यायची ...
पुन्हा दार उघडून आणून द्यावी लागली... झाल निघालो ...

गाडी पार्किंग मधे लावली आणि खाली उतरतोच तो
समोर पास च्या रांगेकडे लक्ष गेलं , बापरे कंठ एका
क्षणात सुकला... इतकी मोठ्ठी रांग तर लोक देव दर्शनाला
सुद्धा लावत नसतील..!! तेवढ्यात आमच्या सौभाग्यवती .
आहो चला ना उशीर होतोय...!! गाडी लॉक करून जरा पुढे
झालो समोर एक मोठा बोर्ड ... पार्किंग ऍट ओन रिस्क
पुढे गेलो आणि पास साठी रांग लावली तेवढ्यात शेजारचे
पटेल दिसले ... म्हणाले "कें संतोष भाई सू वात छे"
मी मनातच "सू" आणि "वात" ह्याचा इथे काय संबंध....?
अहिया सू करावा ..? दांडिया रमवा ...? पुन्हा "सू" ...!!
मला ह्यातला फक्त एकाच शब्द कळला तो म्हणजे "दांडिया"
मी हसत मान होकारर्थी हलवली, " तो पाची लीने मा सुकां
उभा चे आवि जाव म्हारा पासे 2 पास एक्सट्रा छे..
मला काहीच न कळल्या मुळे मी तसाच उभा, तो पुन्हा
म्हणाला "संतोष भाई हॅमेरे पास ने बे पास एक्सट्रा छे..
"ओह अस्स होय मग आधी नाही का सांगायच "
"काय पटेल साहेब तुम्ही पण" मी म्हणालो...!!
मी त्यांच्या कडून पास घेतले आणि त्यांना पैसे विचारले
त्यांनी मला चक्का 300 र्स चा पास 600 ला सांगीतला...!!
म्हटला पटेल साहेब पण ह्याची किंमत तर 300 आहे



मग 600 अरे संतोष भाई शाला ते पास मी 550 ला बिकत घेतला आत्ता तुम्ही आपणा मानस आहे म्हणून तुम्हाला 600 हां काय थोडा प्रॉफीत झालाच पाहिजे ना ...!!
मी पैसे दिले त्यांचे आभार मानले आणी आमच्या सौभाग्यवातींना घेऊन सरळ आत चालता झालो ...!!
आत गेलो तर संपूर्ण मैदान भरलेल, कोण कुठे तर कोण कुठे नाचताय कशयाचा कशाला पत्ता नाही ...!!
ते स्टेज वर दोघजण ढोल बडवतायत, बाकीच बरच काही आणि दोघजण हातात माईक घेऊन काहीतरी गातायत ..

ही मला म्हणाली "चला आपण पण नाचुया "...
"अगं पण कुठे नाचणार आहेस" .. ? " इथेच" " एकटेच"
" एकटे कुठे आहेत की एवढी लोकं"

"पण आपण एकटेच आहोत ना " "नाही ओ थोड्या वेळाने बघा कितीतरीलोका आपल्याला जॉइंट होतील "
" मी घाबरलो जॉइंट ...? मग कळला की जॉइन ...!!
"येत नसून सुद्धा बायकोच्या आग्रहाखातर घेतल्या टिप-या हातात" आणि झालो सुरू"

तो स्टेज वरचा मोठ्या मोठ्याने गात होता " अरे कुकडा तारी ....... मिठी मिठी लागे "....

तेवढ्यात माझ्या बाजूच्या घोळक्यातले एक सभ्य मराठी गृहस्थ ओरडले " अरे कोंबड्यांना काय ओरडायला सांगतोय तूच गा ... खंडेरायच्या लग्नाला ....."

मला काय बोलाव कळेना माझा अर्ध लक्ष माझ्या बायकोकडे आणि अर्ध त्या ओरड्णा-याकडे ...!!



तेवढ्यात स्टेज वरचा ... हे ............ रांगीलो म्हारॉ धोळणा धोळणा रे .... !! घोळकयातले ... अरे एवढे ढोल कसला रंगवतोय गाण बॉल... आईचा गोंधळ मांडला ग अंबे गोधळा .....!!

आणि त्यात माझी सौभाग्यवती आहो नाचा काय झालं ..!!
मी .. अगं येतय कुठे मला ... !!
लगेच मला माझ्या लग्नातली वरात आठवली.....!!
वरातीत नाचताना पक्या म्हणाला होता
"संतोष आत्ता जे काय बायकोला नाचवून घ्याचाय
ना ते घे उद्यापासून ती तुला नाचवणार" ....!!
मला घाम फुटला एका झटक्यात ... !

थोडा वेळ ईकडे तिकडे नाचल्यावर सौभाग्यवती म्हणाल्या ... "आहो ऐकताय का .. ?" माझी छाती पुन्हा धडधडू लागली म्हंटल .. "आत्ता काय .. ?"
"मला भूक लागलीये चालना काहीतरी खाउया "
मी सूकाच आवंढा गिळला म्हंटल " चला ... "

एका दाबेलीच्या स्टाल वर गेलो आणि मी 2 दबेलीची ऑर्डर केली ... तेवढ्यात एक गृहस्थ तिथे आले आणि त्या स्टॉल वाल्याला म्हणले भैईया डॉ डाबेली दे ...!! आणि मला हसू आवरलच नाही ...!

मी हसतच दाबेलीच्या प्लेट्स हातात घेतल्या आणि तिथे उभे राहून दोघेही खाउ लागलो इतक्यात मागे नाचत असलेल्या मंडळीपैकी कुणीतरी मला मागून धक्का दिला आणि मी त्या दाबेलीच्या थाळीवर...! माझा आवडाता शर्ट त्या भजीने लाल झाला आणि माझ्या रागचा पारा चढला मी मागे वळून त्या माणसाकडे रागाने बघत म्हणालो "काय रे तुला दिसत नाही का .. ?



तो म्हणाला सॉरी भाय सॉरी... " हु चाल करीने नाथ आयवा तमहारा उपर, ओला रमता रमता आविद्या ...! "

माझा डोक आणखिनच फिरल मला कळेना हा काय बोलतोय, मी त्याला मारायला हात उचलणार तेवढ्यात माझ्या सौभाग्यवती पेटल्या.!! आणि त्याच्या कानशिलात चांगलीच सट्कन दीली,
दाखवला तिने आपणा कोल्हापुरी ईंगा ... ज्याची भीती होती तेच झाल...!! तो असला भिरभीरला आणि त्याची बोलतीच बंद...!! त्याच्या बरोबरची सगळी माणसे डोळे वटारून बघत होती...!!
त्यावर आमच्या ह्या "काय रे डोळे फुटले की काय तुझे...!! "
मी तिला मागे खेचत सावरत जाऊदे म्हंटल ...!!
आणि तिला तिथून बाजूला घेऊन आलो ...!!
तरी ती बडबडतच होती....!!
मग मीच म्हंटल "आता काय ...!! जाउया घरी"
ती म्हणाली "काआआआआआआआआय...?
खेळणार नाही का ...? मी ... अजुन तुला खेळायचाय...? "
माझी अवस्था बघितलीस का ... ?
तर म्हणे फ़ॅशन आहे अस समजा आणि खेळा ...!!
आणि तिने मला असला नाचवला की बास ....!!
थोड्या वेळाने आम्ही दोघेही थकलो...!! मग तीच म्हणाली चला जाउया ...!! आणि मी सुटकेचा निश्वास टाकला ...!!
सुटलो बुवा एकदाचा ....!! तिला घेऊन तसाच पटकन बाहेर आलो ...!! ही नाचून खूप थकली होती डोक माझ्या खांद्यावर ठेवून झोपली ...!! मला खूप बरं वाटल ....
कारण आज मला एक गोष्ट कळली की जरी ही माझ्या बरोबर रोज कितीही भांडत असली तरीही हिचं माझ्यावर खूप प्रेम आहे ....!!

\- संतोष नार्वेकर

# ई साहित्य प्रतिष्ठान

## ई साहीत्य प्रतिष्ठानची ईतर विनामुल्य ई साप्ताहिके

नेटाक्षरी , स्वर नेटाक्षरी , बाल नेटाक्षरी

## प्रसिध्द झालेली ई बुक्स

टल्लीची शाळा , मकरंदच्या त्रीवेण्या , ग्रेव्हयार्ड लिटरेचर , चार क्षण ,
तो आणी ती , प्रियेचे अभंग , देशी दारूचे दुकान , ई शाळा ,
तो मी आणि सिगरेट , मोरया , लोकल गोष्टी , मीरा

## आमची ई बुक्स विनामुल्य मिळवण्यासाठी

esahitya @gmail.com